(४४२५२२३२) या लेखाशिर्षामधील सुधारित
योजनेच्या नावास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०७/२२-स,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०३ मार्च, २०२५.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० च्या कलम ६२ (ई) नुसार सहकारी संस्थाना महाराष्ट्र शासन मदत करु शकते. शासनाने यापूर्वी शुश्रुषा सिटीझन्स को-ऑपरेटीव्ह हॉस्पीटल्स लि. या रुग्णालयास परतफेडीवर भागभांडवल उपलब्ध करुन दिले होते. त्यावेळी मागणी क्रमाक-व्ही -३, ४४२५- सहकारावरील भांडवली खर्च, (१०८) इतर सहकारी संस्थांत, गुंतवणुका- औद्योगिक सहकारी,(००)(०५) इतर संकीर्ण सहकारी संस्था (कार्यक्रम) "शुश्रुषा सिटीझन्स को-ऑपरेटीव्ह हॉस्पीटल लि. मुंबई" साठी भागभांडवल, (कार्यक्रम), (४४२५२२३२), ५४-गुंतवणूका याप्रमाणे नविन लेखाशिर्ष मंजूर करण्यात आले होते.

मा. मंत्रिमंडळाच्या दिनांक ३०/०७/२०२४ रोजी झालेल्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार नंदिग्राम वैद्यकीय सहकारी संस्था, म. नांदेड संचलित श्री. गुरूजी रूग्णालय, छत्रपती चौक, पूर्णा रोड, नांदेड या संस्थेस भागभांडवलाच्या प्रमाणात १:९ प्रमाणे परतफेडीच्या अटीवर अर्थसहाय्य रू. ९.०० कोटी भागभांडवल स्वरुपात (Redeemable Preference shares) उपलब्ध करुन देण्याबाबत विभागाच्या दिनांक २०/०८/२०२४ रोजी शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. उपरोक्त नमूद लेखाशिर्ष ४४२५२२३२ मधील उपशिर्षाखाली योजनेचे नाव- "(०५)(०२) शुश्रुषा सिटीझन्स को. ऑपरेटीव्ह हॉस्पिटल लि. मुंबई साठी भांगभांडवल (कार्यक्रम)" असे नमूद आहे. प्रस्तुत लेखाशिर्षाखाली उपशिर्षात योजनेत विशिष्ट सहकारी संस्थेचे नांव नमुद असल्याने नंदिग्राम वैद्यकीय सहकारी संस्था, म. नांदेड (संचलित श्री. गुरूजी रूग्णालय, छत्रपती चौक, पूर्णा रोड, नांदेड) या संस्थेस सदर लेखाशिर्षाखाली भागभांडवल उपलब्ध करुन देणे शक्य होत नाही. तसेच भविष्यात इतर सहकारी संस्थेकडून मागणी आल्यास त्या संस्थासाठी सहाय्य म्हणून भागभांडवल उपलब्ध द्यावयाचे झाल्यास उपरोक्त लेखाशिर्षामधून भागभांडवल उपलब्ध करुन देणे योग्य होणार नाही याकरिता सर्वसमावेशक असे योजनेचे नाव उपलेखाशिर्षात नमूद असणे आवश्यक आहे. याकरिता सदर योजनेच्या नांवात "(०५)(०२) शुश्रुषा सिटीझन्स को. ऑपरेटीव्ह हॉस्पिटल लि. मुंबई साठी भांगभांडवल (कार्यक्रम)" या ऐवजी "(०५)(०२) इतर संकीर्ण सहकारी संस्थांसाठी भागभांडवल (कार्यक्रम)" अशी सुधारणा करण्याबाबत प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय :-**

४४२५२२३२ या लेखाशिर्षाखालील योजनेच्या नावात "(०५)(०२) शुश्रुषा सिटीझन्स को. ऑपरेटीव्ह हॉस्पिटल लि. मुंबई साठी भांगभांडवल (कार्यक्रम)" या ऐवजी "(०५)(०२) इतर संकीर्ण सहकारी संस्थांसाठी भागभांडवल (कार्यक्रम)" अशी खालील प्रमाणे सुधारणा करण्यास याअन्वये शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

| | लेखाशिर्षामधील योजनेचे सुधारित नाव |
|---|---|
| मागणी क्रमांक | व्ही-०३ |
| प्रधान लेखाशिर्ष | ४४२५ - सहकारावरील भांडवली खर्च |
| गौण शिर्ष | १०८- इतर सहकारी संस्थामधील गुंतवणूका |
| गट शिर्ष | ०५ - इतर संकीर्ण सहकारी संस्था |
| **योजनेचे नाव** | **(०५)(०२) इतर संकीर्ण सहकारी संस्थांसाठी भागभांडवल (कार्यक्रम)** |
| | ५४ गुंतवणुका |
| आठ अंकी संगणक सांकेतांक | ४४२५२२३२ |

२. सदर निर्णय नियोजन विभाग अनौ. सं. क्र. १८/का.१४३४, दिनांक १५.०१.२०२५ व वित्त विभाग अनौ. सं. क्र. ७३४/२०२४/व्यय-२, दिनांक २५.११.२०२४ अन्वये तसेच सं: ख.वि./चा-१/सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग/युओआर-२५५/२०२४-२५/२०१५, दिनांक १०.०१.२०२५ रोजीच्या पत्रान्वये प्रधान महालेखाकार(लेखा व हकदारी), महालेखापाल कार्यालय, महाराष्ट्र, मुंबई यांनी दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३०३१४५९३७९१०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANKUSH PANDURANG SHINGADE

Digitally signed by ANKUSH PANDURANG SHINGADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=0619305c0a0825664efa457ffa51c3f2364841c81f8c437078a333b7111446a2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E11F71FCAC231B0F91F430636DE14F6C49B569D173346155B9208DCD97DD078B, cn=ANKUSH PANDURANG SHINGADE
Date: 2025.03.03 15:00:44 +05'30'

**( अं. पां. शिंगाडे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३ ) मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्विय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६) मा.अपर मुख्य सचिव, वित्त यांचे वरिष्ठ स्विय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
७) मा. अ.मु.स., सहकार यांचे वरिष्ठ स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८) मा. अ.मु.स., वित्त विभाग/व्यय यांचे स्विय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
९) मा. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१०) मा. महालेखापपाल, लेखा व परीक्षा, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
११) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, नांदेड.
१३) अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई/नागपूर.
१४) निवासी लेखा अधिकारी, नागपूर.
१५) उप सचिव, नियोजन विभाग (का-१४३१), मंत्रालय, मुंबई.
१६) उप सचिव, वित्त विभाग (व्यय-२), मंत्रालय, मुंबई.
१७) निवड नस्ती, कार्यासन-२२-स.